भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या
अहवालांसंदर्भातील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने
ई-मेलद्वारे पाठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :-लोलेस-२०१८/ प्र.क्र.१९४ / लोलेस**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८.**

## प रि प त्र क

भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे विविध अहवाल विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहास सादर केले जातात. सदर अहवाल (इंग्रजी व मराठी) वित्त विभाग तसेच सर्व मंत्रालयीन विभाग यांचेकडे परिपत्रकासोबत आवश्यक त्या समयबध्द कार्यवाहीसाठी पाठविण्यात येतात.

सर्व संबंधीत मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या अहवालामध्ये नमुद करण्यात आलेल्या त्यांच्या विभागाशी संबंधीत परिच्छेद/ आक्षेप या बाबींवर स्वयंपूर्ण स्पष्टीकरणात्मक ज्ञापने विहीत प्रपत्रात तयार करुन अहवालाच्या प्रती मिळाल्यापासून तीन महिन्याच्या आत लोकलेखा समिती विधानमंडळ सचिवालय यांच्याकडे पाठवावीत. स्पष्टीकरणात्मक ज्ञापने कोणत्याही परिस्थितीत लोकलेखा समितीकडे परस्पर न पाठविता संबंधीत विभागांच्या सचिवांच्या मान्यतेने महालेखापालांकडून तपासून संमत ( vetting ) करुन नेहमीप्रमाणे त्यांच्या ४० मराठी व २० इंग्रजी प्रती प्रती (हार्ड कॉपी) लोकलेखा कक्षात देण्यात यावीत व सॉफ्ट कॉपी ई-मेलद्वारे ( Soft Copy word Format ) मध्ये d1.pac.mls@gmail.com या ई-मेल आयडीवर सुध्दा विधानमंडळ सचिवालयास पाठविण्याबाबत या परिपत्रकाद्वारे सर्व विभागांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०२४१२०६३०११०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: CN = Anudeep Shrinivas Dighe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2018.10.24 12:15:34 +05'30'

(अ. श्री. दिघे)
उपसचिव, वित्त विभाग

**प्रति,**

१) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
२) लोकलेखा समिती, विधानमंडळ, मुंबई.